**मा. उच्च न्यायालय, मुंबईचे नागपूर खंडपीठ यांनी स्वाधिकाराने दाखल केलेली जनहित याचिका क्रमांक ३०/२०१६ मध्ये दिलेल्या आदेशानुसार नागपूर व वर्धा जिल्हा माथाडी आणि असंरक्षित कामगार मंडळाच्या कामकाजाची चौकशी करण्यासाठी समिती नियुक्त करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. युडब्ल्युए-२०१६/प्र.क्र.१४९/कामगार-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २८ ऑक्टोबर, २०१६

वाचा :- मा. उच्च न्यायालय, मुंबई,खंडपीठ नागपूर, यांनी जनहित याचिका क्रमांक ३०/२०१६ मध्ये दि.१८/१०/२०१६ रोजी दिलेले आदेश.

**प्रस्तावना :-**

नागपूर व वर्धा जिल्हा माथाडी आणि असंरक्षित कामगार मंडळाच्या एकाधिकार कामकाज पध्दतीबाबत वृत्तपत्रातील लेखाच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर यांनी स्वाधिकाराने जनहित याचिका क्रमांक ३०/२०१६ दाखल करुन सदर याचिकेतील प्रतिवादी क्र.६ नागपूर व वर्धा जिल्हा माथाडी आणि असंरक्षित कामगार मंडळाच्या अनागोंदी कारभाराबाबत चौकशी होणे अत्यावश्यक असल्याचे दि. १८/१०/२०१६ रोजी आदेश दिले आहेत. मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मा. उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी जनहित याचिका क्रमांक ३०/२०१६ मध्ये दि. १८/१०/२०१६ रोजी दिलेल्या आदेशानुसार महाराष्ट्र माथाडी, हमाल व इतर श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण ) अधिनियम, १९६९ च्या कलम-२३ मधील तरतूदींनुसार नागपूर व वर्धा जिल्हा माथाडी आणि असंरक्षित कामगार मंडळाच्या कामकाजाची चौकशी करण्यासाठी खालीलप्रमाणे त्रिसदस्यीय समिती नियुक्त करण्यात येत आहे:-

१) समितीची रचना खालीलप्रमाणे राहिल:-

| | |
|---|---|
| १) पोलीस महानिरीक्षक,श्री. रविंद्र कदम (नागपूर परिक्षेत्र ), नागपूर | **अध्यक्ष** |
| २) महाराष्ट्र माथाडी, हमाल व इतर श्रमजिवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९६९ व कामगार कायद्यातील तज्ञ- श्री.किशोर वासुदेवराव ठाकरे (सेवानिवृत्त औद्योगिक व कामगार न्यायालयाचे न्यायाधीश) | **सदस्य** |

३) विभागीय आयुक्त (महसूल),नागपूर विभाग,यांचा उपजिल्हाधिकारी पेक्षा कमी दर्जा नसलेला प्रतिनिधी. — **सदस्य**
श्री. सुधाकर कुळमेथे,उप जिल्हाधिकारी,(जमिन सुधारणा),
विभागीय आयुक्त, नागपूर यांचे कार्यालय, नागपूर

**२) समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहिल :-**

१) मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर जनहित याचिका क्र. ३०/२०१६ सोबत रिट याचिका क्र. ११२१/२०१६ यात मा. उच्च न्यायालयाने दि.१८/१०/२०१६ रोजी पारित केलेल्या आदेशात उपस्थित केलेल्या मुद्दयांच्या अनुषंगाने नागपूर व वर्धा जिल्हा माथाडी आणि असंरक्षित कामगार मंडळाची सखोल चौकशी करणे.

२) महाराष्ट्र माथाडी, हमाल व इतर श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण ) अधिनियम, १९६९ च्या कलम २३ अन्वये प्रदान अधिकारानुसार नागपूर व वर्धा जिल्हा माथाडी आणि असंरक्षित कामगार मंडळामार्फत राबविल्या जाणाऱ्या योजनांची अंमलबजावणी अधिनियमातील तरतूदीनुसार करण्यात येते किंवा कसे, याची चौकशी करणे.

३) समिती सदरहू चौकशीसाठी कामगारांचे प्रतिनिधी, मालक प्रतिनिधी तसेच इतर हितसंबंधीत यांना बोलावून त्यांचे मतही जाणून घेतील.

४) समिती सदरहू चौकशी अहवाल मा. उच्च न्यायालयात दि. १७/०१/२०१७ पूर्वी सादर करेल. तसेच सदर अहवालाची एक प्रत शासनाकडे (कामगार विभाग) सादर करेल. चौकशी अहवाल मा.उच्च न्यायालयाने विहित केलेल्या कालमर्यादेत न्यायालयास सादर करणे आवश्यक असल्याने समितीला कोणतीही मुदतवाढ दिली जाणार नाही.

५) चौकशी समितीस महाराष्ट्र माथाडी, हमाल व इतर श्रमजीवी कामगार ( नोकरीचे नियमन व कल्याण ) अधिनियम, १९६९ च्या कलम २३ (२) अनुसार नागपूर व वर्धा जिल्हा माथाडी आणि असंरक्षित कामगार मंडळ सर्व सोयी तात्काळ उपलब्ध करुन देईल.

६) चौकशी समितीस महाराष्ट्र माथाडी, हमाल व इतर श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण )१९६९ च्या कलम २३ (३) अनुसार या अधिनियमान्वये नेमलेल्या निरीक्षकांचे सर्व अधिकारांचा वापर करता येईल.

७) चौकशी समितीतील अध्यक्ष व सदस्य यांना वित्त विभाग, शासन निर्णय क्र. प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५ (प्रवास भत्ता व दैनिक भत्ता) दिनांक ०३ मार्च, २०१०, शासन निर्णय क्र. बैठक-२०१२/प्र.क्र.०१/सेवा-५, दिनांक २४ मे, २०१२ (बैठक भत्ता), तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दि.८ जानेवारी, २०१६ (से.नि.) प्राधिकाऱ्याला परिश्रमिक व इतर नियमानुसार अनुज्ञेय असलेले भत्ते नागपूर व वर्धा जिल्हा माथाडी आणि असंरक्षित कामगार मंडळामार्फत वेळोवेळी अदा करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संकेतांक २०१६१०२८११४२२०९११० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Varsha M Bharose

Digitally signed by Varsha M Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3e1fb27510d815dfa2ea1884eedb57e92914ff13c7358c095d3c03f9593e23d5, cn=Varsha M Bharose
Date: 2016.10.28 16:36:00 +05'30'

(व. मुं. भरोसे)
शासनाचे उप सचिव

**प्रत माहितीसाठी अग्रेषित :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव (पत्राने)
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
६. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
८. प्रधान सचिव (कामगार व प्रशासन), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
९. श्री. रविंद्र कदम, पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर परिक्षेत्र,नागपूर
१०. श्री. किशोर वासुदेवराव ठाकरे, (सेवा निवृत्त औद्योगिक व कामगार न्यायालयाचे न्यायाधीश), घर क्रमांक ७, दलश्री अपार्टमेंट, ३ रा मजला, अे.अे.बी.सर्कल, महात्मा नगर, नाशिक ४२२ ००७
११.विभागीय आयुक्त (महसूल), नागपूर विभाग, नागपूर,
१२.कामगार आयुक्त,कामगार भवन, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स,बांद्रा, मुंबई-५१.
१३.श्री. सुधाकर कुळमेथे, उप जिल्हाधिकारी (जमिन सुधारणा),विभागीय आयुक्त, नागपूर विभाग यांचे कार्यालय, नागपूर.
१४. कामगार उपायुक्त, नागपूर आणि वर्धा जिल्हा माथाडी आणि असंरक्षित कामगार मंडळ, भोसला चेबर्स, सिव्हील लाईन्स, नागपूर.
१५. प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांना जनहित याचिका क्र. ३०/२०१६ संदर्भात रवाना.
१६.निवड नस्ती.